# पवित्र कुरआनातील
# मानवतेची शिकवण

लेखक

विजय गोपाल मंगल

भाषांतर

शाहजहान मगदुम

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# दोन शब्द

मानव ईश्वराची एक महत्त्वपूर्ण निर्मिती आहे आणि त्यास जगात एक महत्त्वाचे स्थान मिळाले आहे. मानवास ईश्वराने बुद्धी प्रदान करून त्यात विचार करण्याची, बरे-वाईट समजून घेण्याची शक्ती दिली. त्यावर चारित्रिक व नैतिक उत्तरदायित्वाची जबाबदारी सोपविली आणि त्याच्यासाठी कर्मानुसार मरणोत्तर जीवनात स्वर्ग-नरकाचे नियोजन करून ठेवले. जेव्हा मानव आपल्यावर सोपविण्यात आलेल्या या नैतिक व चारित्रिक उत्तरदायित्वास पार पाडताना व्यावहारिक रूप देतो तेव्हा त्यास थोडक्यात 'मानवता' असे म्हटले जाते. मानवतेत न्याय, प्रेम, स्नेह, दया, बंधुत्व, मर्यादा, सभ्यता इत्यादी सर्व भाव समाविष्ट असतात. म्हणूनच मानवसमाजात मानवतेचा उत्कर्ष वाढल्यामुळे त्यात न्याय, प्रेम व बंधुत्व इत्यादींचे प्रचलन वाढते. खरे तर मानव-हृदयात उपरोक्त भाव म्हणजे मानवता नैसर्गिक रुपातच अस्तित्वात असते, जी त्याच्या निर्मात्याने आपल्या निर्मितीबरोबरच देऊन जगामध्ये त्यास पाठविले आहे. मानव आपल्या कुचारित्र्याद्वारे या नैसर्गिक गुणांना दाबून ठेवतो. मानव जेव्हा मानवतेस तिलांजली देतो तेव्हा तो मनुष्यत्वाची खालची पातळी गाठतो आणि त्याचे चारित्र्य पाशवी बनते. मग अशा लोकांमुळे अस्तित्वात येणाऱ्या विनाशकारक परिणामांमुळे मानवतेवर मोठा आघात होतो. मानवसमाजात विनाश व अराजकता पसरते. पवित्र कुरआन ईश्वराकडून सर्व मानवांच्या मार्गदर्शनासाठी पाठविण्यात आलेला ग्रंथ आहे. यात मानवांच्या संपूर्ण जीवनाकरिता मार्गदर्शन आहे. मानवास जगात पाठविण्यामागच्या उद्देशाचे स्पष्टीकरण देण्यात आले आहे. मृत्यूनंतर काय होईल. याबाबतीतदेखील त्याने मानवास सावध केले आहे.

या पुस्तकात कुरआनमध्ये सांगितलेल्या मानवतेच्या शिकवणींवर प्रकाश टाळण्यात आला आहे. या पुस्तकाचे लेखक विजय गोपाल मंगल आहेत. ते वाणिज्य व विधीचे स्नातक असून व्यवस्थापन शास्त्रात स्नातकोत्तर आहेत आणि भारत सरकारमध्ये एका प्रतिष्ठित पदावर कार्यरत आहेत. ते यथार्थप्रिय व तत्वज्ञानी प्रवृत्तीचे व्यक्ती आहेत. त्यामुळे ते अनेकानेक ग्रंथाचे अध्ययनसुद्धा करीत असतात. तसेच त्यांनी पवित्र कुरआन व संबंधित इस्लामी साहित्याचेदेखील अध्ययन केले आहे. पूर्ण अध्ययनांती त्यांनी आपले मत मांडताना एक विस्तृत लेख लिहिला. तोच लेख आता पुस्तिकेच्या रूपात आपल्या हातात आहे. ही पुस्तिका दिसायला संक्षिप्त असली तरी आपल्या विषयात ती बिंदूत सिंधूसारखी आहे. हे पुस्तक प्रकाशित करताना एका यथार्थवादी व्यक्तीचे विचार सर्वसामान्यांपर्यंत पोहचविण्याचे आम्ही एक माध्यम बनत आहोत याचा अत्यानंद होत आहे. हे पुस्तक भ्रष्टाचार समाप्त करण्यास, सांप्रदायिक तणाव कमी करणारा आणि मानवी बंधुभाव वाढीस लागण्यास उपयुक्त ठरो अशी आम्ही ईश्वरापाशी प्रार्थना करतो.

वाचकांना विनंती आहे की, त्यांनी या पुस्तकाचे पूर्णत: निरपेक्षपणे अध्ययन करावे आणि सखोल माहितीकरिता संबंधित ग्रंथ व पुस्तकांचा अभ्यास अवश्य करावा. ईश्वर मानवास सत्यमार्ग अवलंबिण्याचे साहस प्रदान करो! हीच आमची प्रार्थना आहे !

इंजि. तौफीक असलम खान

अध्यक्ष,

इस्लामिक मराठी पब्लिकेशन्स ट्रस्ट

आरम्भे तदनुध्यानं भक्तै निर्सेवितम् ।
मार्गदर्शनं मनुष्याणां पैगंबरैर्गूढ़ शोधनम् ।।

ज्या एक ईश्वर (अल्लाह) ची भक्ती करून भक्तांनी जीवन सफल केले, ज्याने मानवास मानवतेची (सदाचाराची) शिकवण दिली आणि पैगंबरांद्वारा रहस्यांचे गूढशोधन (स्पष्टीकरण) करविले, त्याचे मी सर्वप्रथम स्मरण करतो.

कुरआनचा सार त्याचा प्रथम अध्याय 'सूरह फातिहा' मध्ये आहे असे मानले जाते. वरील श्लोक त्याचीच भावाभिव्यक्ती आहे. पवित्र कुरआन मुस्लिमांचा वैयक्तिक धर्मग्रंथ समजला जात असला तरी वास्तवात तो समस्त मानवजातीची आध्यात्मिक ठेव आहे. यात देण्यात आलेले ज्ञान अल्लाहने स्वत: आपले विशेष देवदूत जिब्रील यांच्यामार्फत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हृदयात अवतरित केले होते म्हणून यासदेखील वेदांप्रमाणेच ईशज्ञान म्हटले जाते. स्वत: कुरआनात म्हटले आहे,

"हा एक उच्चकोटीचा कुरआन आहे, एका सुरक्षित ग्रंथात अंकित, ज्याला पवित्रांशिवाय कोणी स्पर्श करू शकत नाही, हा सकल जगांच्या पालनकर्त्याकडून अवतरित आहे." (कुरआन - ५६ : ७८-८०)

सर्वप्रथम हिराच्या गुहेत "इक़्-र. बिसमिरीब्बि-क" (कुरआन ९६ : १) "वाचा आपल्या पालनकर्त्याच्या नामासहित." ही आयत पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हृदयात अवतरित झाली. मग त्यांच्या वयाच्या चाळीसाव्या वर्षापासून ते ६३ व्या वर्षापर्यंत म्हणजे २३ वर्षांपर्यंत थोडे थोडे करून कुरआनात देण्यात आलेले ज्ञान त्यांच्या हृदयावर अवतरित झाले.

आपणास उपलब्ध असलेली कुरआनची आवृत्ती इ.स. ६५३ मध्ये जवळपास खलीफा उस्मान (रजि.) यांच्या काळी तयार करण्यात आली होती. कुरआन ३० खडांमध्ये (पारा) विभागण्यात आले आहे. कुरआनच्या काही आयती मदीना येथे तर काही आयती मक्का येथे अवतरित झाल्या, त्यामुळे त्याचे ११४ अध्याय (सूरह) 'मक्की' आणि 'मदनी' अशा दोन भागांमध्ये विभागले आहेत. मात्र ते अवतरित झालेल्या क्रमाने लावण्यात आलेले नाहीत. सुरुवातीच्या अध्यायांच्या तुलनेत शेवटचे अध्याय लहान आहेत. अध्यायास 'सूरह' असे नाव देण्यात आले आहे. याची भाषाशैली अरबी भाषेचा सर्वश्रेष्ठ नमुना असून मधुर, सरल व कवितामय असल्याने गेय आहे.

## तत्कालीन परिस्थिती

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सहकारी माननीय जाफर (रजि.) यांनी ॲबेसिनियाच्या राजास दिलेल्या निवेदनावरून तत्कालीन अरबस्थानच्या परिस्थितीची व पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनाच्या तत्वज्ञाची कल्पना येते. ते म्हणाले,

"हे राजन् ! आम्ही रानटीपणात व मार्गभ्रष्टतेच्या अंधकारात शतकानुशतके भटकत

होतो. आम्ही अल्लाहला विसरून मूर्तीची पूजा करीत होतो. आम्ही मृतजीवांचे मांस खात होतो. परस्त्रीगमन, लुटमार, चोरी व दुसऱ्यांवर अत्याचार करणे आमच्या दैनिक जीवनाचे अंग बनले होते. प्रत्येक शक्तीवान व्यक्ती निर्बलांना आपल्या महत्वकांक्षेचा शिकार बनवित व यावर गर्व करीत असे. तात्पर्य, आमचे जीवन जनावरे व हिंस्त्र पशुपेक्षासुद्धा जास्त वाईट बनले होते. ईश्वराने आम्हावर कृपा केली आणि आमच्यातून एक माणूस असा उभा केला ज्याला ईश्वराने आपला पैगंबर बनविला. आम्ही त्याच्या परिवाराला व त्याच्या जीवनाला चांगल्या प्रकारे जाणून आहोत. तो अत्यंत सच्चेपणा, सदाचारी, प्रामाणिक व पुण्यात्मा आहे. त्याच्या प्रामाणिकतेची आणि सज्जनतेची मित्र व शत्रु दोन्ही प्रशंसा करतात. त्यानेच आम्हाला इस्लामचा उपदेश केला ज्याचा अर्थ आहे, ईशनियमांचे पालन करणे त्याने सांगितले की आम्ही मूर्ती पूजेला त्यागून केवळ अल्लाहला आपला उपास्य व प्रभु मान्य करावे. त्याने आम्हाला शिकवण दिली की आम्ही खरे बोलावे आणि हिंसेचा मार्ग व अत्याचारी मार्ग त्यागावा. अनाथांच्या संपत्तीला हडप करू नका. शेजाऱ्यांशी, दयार्द्रपणे वागा आणि परस्त्रीगमन इ. दुष्कर्मांचा त्याग करा. नमाज अदा करा, उपवास (रोजा) करीत जा, गोरगरीबांना दान-धर्म (जकात) करा. भिकारी आणि निर्धनांची मदत करा, अशी आज्ञा केली.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांचा परिचय

पैगंबर मुहम्मद (स.) यांचा जन्म इ. स. ५७० मध्ये अरबस्तानातील मक्का शहरात झाला. त्यांच्या बालपणीच त्यांच्या माता-पित्याचा देहान्त झाला होता. त्यामुळे त्यांचे पालनपोषण त्यांचे चुलते अबू तालिब यांनी केले. जेव्हा ते मोठे झाले तेव्हा त्यांनी खदीजा (रजि.) नामक एका श्रीमंत विधवेकडे नोकरी केली. पुढे वयाच्या २५ व्या वर्षी तिच्याशीच विवाहबद्ध झाले. त्या काळी अरबस्तानात मूर्तीपूजा प्रचलित होती, एकट्या काबागृहात ३६० मूर्ती होत्या आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचा कुरेश कबिलाच त्याचा पुरोहित होता. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) ख्रिस्ती भिक्षुंप्रमाणे दरवर्षी काही दिवसांकरिता हिराच्या गुहेत एकांतवास व ईश्वरस्मरणासाठी जात असत. वयाच्या ४० व्या वर्षी इ.स. ६१० मध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर पहिला दिव्यबोध (Revelation) अवतरित झाला. त्यानंतर मुहम्मद (स.) यांना एका पाठोपाठ एक असे अनेक दिव्यबोध म्हणजेच ईशसंदेश प्राप्त झाले. अल्लाहच एकमेव ईश्वर आहे आणि ते स्वत: अल्लाहचे एक पैगंबर आहेत यावर त्यांना पूर्ण विश्वास झाला. अल्लाहचा दिव्य संदेश प्राप्त करून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एक अल्लाहची उपासना आणि सदाचाराचा उपदेश सांगण्यास सुरुवात केली.

जगामध्ये समाज सुधारकाचे कार्य खरे तर फार कठीण असते. जगात प्रचलित कुकर्म व दुष्कृत्यांचे जेव्हा समालोचन होते तेव्हा जनसमुदाय आपल्या चिरस्थापित नीतीच्या वलयांमध्ये गत्यावरोध पाहून त्यांचा प्रतिकार करू लागतो आणि त्याकरिता आपल्या अधिकार व शक्तीचा वापर करतो. मोठ मोठी वलयेच नव्हे तर लहानात लहान समुदायदेखील आपल्या आकाराचा विचार न करता त्या वेळी त्याच्या डोक्यावर पाद-

प्रहार करण्यास सुरुवात करतो. मात्र स्थिर नीती सत्यमनस्क सुधारक भर्तृहरि यांच्या नीतीवाक्यानुसार,

निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु, लक्ष्मी: समाविशतु गच्छतु यथेटम्।

अद्यै वा मरणमस्तु युगान्तरे वा, व्याय्यात्पथ: प्रबिचलन्ति पद न धीरः: ॥

अर्थात - समाजसेवक आपले सर्वस्व पणाला लावून त्या संक्रुद्ध जनसमूहाची पर्वा न करता हिमालयासारखा आपल्या जागी स्थिर राहतो.

पारंपरिक विश्वास बाळगणारे अनेक लोक पैगंबर मुहम्मद (स.) यांचे शत्रू झाले परंतु त्यांनी त्याची पर्वा केली नाही. इ.स. ६२२ मध्ये एकेदिवशी कुरेशांनी हत्येच्या उद्देशाने त्यांचे घर चोहोबाजूंनी घेरले. मात्र ईशप्रेरणेने त्यांना या षड्यंत्राची सूचना पूर्वीच मिळाली होती, त्यामुळे त्यांनी मदीनेकडे प्रस्थान (हिजरत) केले. हिजरी सनाची सुरुवात याच दिवसापासून होते. मदीनावासींनी त्यांचे हार्दिक स्वागत केले. मदीना पोहोचल्यानंतर काही काळानंतर तिथेही पोहचून कुरेश आणि त्यांच्या बहकाव्यात आलेले लोक पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या साथीदारांना त्रास देऊ लागले. सरतेशेवटी आत्मरक्षणाचा कोणताही इतर उपाय न उरल्यामुळे विवश होऊन पैगंबर मुहम्मद (स.) यांना त्या दुष्ट लोकांशी अनेक युद्धे करावी लागली. या युद्धांची सांगता मक्का विजय आणि काबागृह मूर्तीरहित करण्याने झाली.

पैगंबर मुहम्मद (स.) त्या विशिष्ट व्यक्तीपैकी होते ज्यांचे स्थान त्यांच्या आसपासच्या धरातलापेक्षा उंच असते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विवश होऊन आत्मसंरक्षणाकरिता शस्त्र हाती घेतले होते, ही गोष्ट अनेक विद्वानांनी मान्य केली असली तरी नंतर अनेक लोकांनी याचा चुकीचा अर्थ लावला आणि यास धर्माच्या प्रचाराचे साधन ठरवून दुष्प्रचार केला. मात्र वास्तविक तथ्य असे आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) जोरजबरदस्तीने धर्मांतर करविण्याच्या विरोधात होते. जसे कुरआनमध्ये म्हटले आहे,

"धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही." (कुरआन २:२५६)

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी व्यर्थ रक्तपातास कधीही उचित ठरविले नाही. कुरआन म्हणतो,

"अल्लाहला उपद्रव मुळीच आवडत नाही." (कुरआन २ : २०५)

"तुमचा धर्म तुमच्यासाठी आणि माझा धर्म माझ्यासाठी." (कुरआन १०९ : ६)

निश्चित ही आयत धार्मिक सहिष्णुतेच्या दृष्टीने प्रशंसनीय आहे.

# इस्लाम एक सनातन मान्यता

कुरआनमध्ये अनेक ठिकाणी निर्णायक आणि स्पष्ट शब्दांत या गोष्टीची घोषणा केली आहे की, कुरआन कोणत्याही नवीन धार्मिक समूहाचा संदेश घेऊन जगात आला नाही तर तो लोकांना त्याच मार्गाकडे बोलवित आहे, जो सनातन काळापासून चालत आला आहे आणि त्याच्याकडे ईश्वराने पाठविलेल्या सर्व संदेशवाहकांनी मनुष्यास बोलविले आहे. मग हे संदेशवाहक कोणत्याही जाती, देश वा क्षेत्रात आलेले का असेनात. कुरआनात म्हटले आहे,

''अल्लाहने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची त्याने नूह (अ.) ला दिली होती. आणि जिला (हे मुहम्मद (स.)) आता तुमच्याकडे आम्ही दिव्यबोधाद्वारे पाठविले आहे आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ). आणि मूसा (अ.) व ईसा (अ.) यांना दिलेला आहे, या ताकीदसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफूट होऊ देऊ नका.'' (कुरआन - ४२ : १३)

त्यामुळेच अल्लाहकडून आलेल्या सर्व संदेष्टांचा व ग्रंथांचा सारखाच आदर करण्यात यावा, ही कुरआनच्या उपदेशाची पहिली वास्तविकता आहे. म्हणजेच ते सर्व सत्यावर होते आणि सर्व अल्लाहचा संदेश पोहोचविणारे होते, यावर विश्वास केला जावा. तसेच या सर्वांनी एकाच सत्याची व एकाच नियमाची शिकवण दिली आणि त्या सर्वांच्या सर्वसंमत शिकवणीनुसार चालणेच उपदेश आणि कल्याणाचा मार्ग आहे.

इस्लाममध्ये एक अल्लाहची धारणा

कुरआनमध्ये म्हटले आहे, ''ईश्वर (अल्लाह) एक आहे आणि तो वास्तविकत एकमेव आहे. अल्लाहची सत्यता त्याच्या इतर सर्व गोष्टींप्रमाणेच त्याची विश्वव्यापी देन आहे. तिचा कोणत्याही विशेष युगाशी, वंश, जाती वा संप्रदायाशीच फक्त संबंध नाही. ती सत्यता अल्लाहच्या सूर्याप्रमाणे प्रत्येक ठिकाणी चमकत असते आणि मानवास प्रकाश पोहोचविते.'' मानवाने कोणत्याही विशिष्ट जाती, भाषा आणि विविध समुदायांचा (राष्ट्रांचा) उपासक न होता फक्त अल्लाहचा उपासक व्हायला हवे. कुरआन म्हणतो, ''सर्वांचा पालनकर्ता एक आहे आणि प्रत्येक व्यक्तीस तिच्या कर्मानुसारच फळ मिळते. अल्लाहची उपासना व सदाचरण हेच मानवाचे कर्तव्य आहे.'' कुरआन पुढे म्हणतो ''मी प्रत्येक पैगंबराचे एकसारखेच समर्थन करतो आणि त्या सर्वांची सामान्य व सर्वमान्य शिकवणच माझी शिकवण आहे. जर तुम्ही धर्माच्या वास्तविक शिकवणीचा सत्यतापूर्वक अवलंब केला तर माझे कार्य पूर्ण झाले, कारण माझा संदेश काही नवीन संदेश नसून तोच सनातन व सार्वभौमिक संदेश आहे जो समस्त पैगंबरांनी दिला आहे.''

ईशपरायणता व मानवाशी मानवतेचा व्यवहार हाच यथार्थ धर्म आहे. एकेश्वरत्वाच्या धारणेमुळे पूर्ण मानवतेची पूर्तता होते हा धर्माचा उद्देश आहे. प्रत्येक मानवात मानवतेची भावना अस्तित्वात असते. ही भावना वैयक्तिक पातळीवर वेगवेगळी

प्रत्येक मानवात कमी-जास्त आढळते. परंतु सामूहिक स्तरावर मानवी मूल्यांच्या काही धारणा चांगल्या असल्याबद्दल सर्व सहमत आहेत आणि काही धारणा वाईट असण्यावर सर्वांचे एकमत आहे. मानवाच्या इतरांसाठी लाभदायक व मानवतावादी कार्यांची समाजात नेहमीच प्रशंसा केली जाते. जसे आईवडिलांची सेवा, शेजाऱ्यांशी सद्व्यवहार, अनाथ व गरिबांना मदत करणे, पीडितांना साह्य करणे. ही सर्व चांगली कामे आहेत. याउलट अन्याय व अत्याचार वाईट कार्ये आहेत. समाजात दया, उदारपणा, विशालहृदयता आणि सहनुभूतीची नेहमीच प्रशंसा करण्यात आली आहे आणि कंजूसपणा, पाषाणहृदयता, स्वार्थीपणा आणि संकीर्ण भावनेस कधीच उच्च स्थान लाभले नाही. सांगण्याचे तात्पर्य असे की, सन्मार्गावर चालणारे, सत्यनिष्ठ, विश्वासू, मनमोकळेपणाने वागणारे, वाणी व कर्मात एकता राखणारे, कर्तव्यमार्गावर दृढ व इतरांकरिता आपल्या धर्माचे पालन करण्यात उदार असणारे, स्वत: शांतपूर्वक राहणारे आणि इतरांनाही शांततापूर्वक राहू देणारे लोकच मानवतेला आपली वाटतात. अर्थात या सर्व गोष्टींचा चांगलेपणा सर्वांना माहीत आहे आणि त्यांच्याविरुद्ध वागणे सर्वसाधारणपणे अयोग्य समजले जाते. जगातील सर्व धर्म, सर्व आचार-विचार, सर्व समाज इतर अनेक गोष्टींबाबत कितीही मतभेद बाळगत असले तरी वरील मानवी मूल्यांबाबत सर्वांचे एकमत आहे.

### सार्वभौमिक मान्यता

कुरआनमध्ये म्हटले आहे की मानवसमाजाने समजून घेतलेल्या चांगलेपणाच्या कार्यांनाच ईशधर्म मानवाचे आवश्यक कर्तव्य ठरवितो. त्याचप्रमाणे लोकांना अमान्य असलेल्या आणि सर्व धर्मांच्या दृष्टीने वाईट असलेल्या सर्व कार्यांना ईशधर्मविरोधी व निषिद्ध ठरवितो. ही गोष्ट धर्माचे मौलिक तत्त्व होती म्हणून यात मतभेद होऊ शकले नाही आणि विविध धार्मिक समुदायांमध्ये अगणित भ्रम अस्तित्वात असताना आणि अनेक सत्यता विसरल्या असूनदेखील ही सत्यता निरंतर प्रकट व सर्वमान्य ठरली. या कार्यांच्या चांगलेपणा व वाईटपणाबाबत जगातील सर्व धर्म व सर्व समुदायांचे लोक सर्व युगांमध्ये सहमत होते. यावरून या सर्व गोष्टी अल्लाहकडून आलेले मनुष्यासाठी आदेश असल्याचे सिद्ध होते. कारण कुरआन ईशदत्त विधान आहे, म्हणून तोदेखील स्पष्टपणे चांगुलपणाची (मारूफ) आज्ञा देतो आणि वाईटपणापासून (मुनकर) रोखतो.

### इस्लाम एक स्वाभाविक धर्म आहे

कुरआनमध्ये म्हटले आहे की, हाच कर्ममार्ग (मानवता) मानवसमाजासाठी अल्लाहकडून निर्धारित करण्यात आलेला नैसर्गिक धर्म आहे. याचेच नाव कुरआनच्या भाषेत 'अल-इस्लाम' आहे. याचा अर्थ आहे, अल्लाहने बनविलेल्या नियमांचे पालन करणे. हे खरे आहे की मानवी आचारसंहिता सर्वमान्य तथ्य आहे आणि समस्त मानवजातीला माहीतसुद्धा आहे आणि कुरआन अल्लाहने बनविलेल्या नियमांचे पालन करण्यास सांगतही आहे. परंतु प्रश्न असा आहे की, कुरआनमध्ये या नियमांना लागू करणाऱ्या कोणत्या नियामक शक्तीच्या बळावर ते प्रचालित व्हावेत आणि कोणत्या प्रेरक शक्ती मानवास त्या

नैतिक कायद्याचे पालन करण्यास बाध्य करतात व तयार करतात?

## मानव अल्लाहसमोर उत्तरदायी आहे

अल्लाह एक असल्याची कुरआनमध्ये मान्यता आहे. अल्लाहच या ब्रह्मांडाचा स्रष्टा, एकमात्र प्रभु, शासक व पालक आहे आणि त्याच्याच इच्छेनुसार समस्त कार्य-कलाप सुरु आहे. तो सर्वज्ञ, सर्वशक्तिमान आणि परोक्ष व अपरोक्ष जाणतो. मानव त्याचाच सेवक आहे, आपल्या स्रष्ट्याचे आज्ञापालन व सेवा करणे हेच त्याचे कार्य आहे. पैगंबरांना अल्लाहने मानवांच्या मार्गदर्शनासाठी पाठविले आहे, त्यांनी ईशग्रथांना लोकांसमोर ठेवलेले आहे. मानवाने आपल्या जीवन व्यवहाराची व्यवस्था उपदेशाच्या या महास्त्रोताच्या कायद्यानुसार निर्मित करणे हे त्याचे कर्तव्य आहे. मानव आपल्या सर्व जीवनव्यवहाराकरिता अल्लाहसमक्ष उत्तरदायी आहे आणि उत्तर देण्याचे हे कार्य त्याला या जगात नव्हे तर मृत्युनंतर परलोकात पार पाडावयाचे आहे. सांसारिक जीवन फक्त परीक्षाकाल आहे. म्हणून मानवास परलोकात अल्लाहसमोर आपल्या उत्तरदायित्वाचा निर्वाह यशस्वीपणे करता यावा या दृष्टिकोनातून आपले सर्व कर्म त्याने पार पाडले पाहिजे. यावरच त्याचे भवितव्य अवलंबून आहे. मानवाकडून संपूर्ण जगात इतरांशी जी काही वर्तणूक केली जाते; तिचे अल्लाहकडून निष्पक्ष निरीक्षण केले जाते. अल्लाह मानवाच्या फक्त कर्मांचेच नव्हे तर त्याच्या विचार व संकल्पांचादेखील हिशोब ठेवतो.

कुरआनमध्ये वर्णित मानव व ब्रह्माडांशी संबंधित या मान्यतेच्या सभोवताली मानवाचे संपूर्ण नैतिक जीवन फिरत आहे. जीवनाचे परम लक्ष्य अल्लाहची प्रसन्नता आहे. हे निश्चित झाल्यानंतर चरित्र व नैतिकतेचे एक लक्ष्य सापडते ज्यामुळे नैतिक विकासाच्या शक्यता दृढ होतात आणि त्यामुळे मानव स्वार्थीपणाच्या दलदलीत अडकू शकत नाही.

## परलोकजीवन : एक नियामक शक्ती

कुरआनमध्ये वर्णित या सम्यक मानवतावादी शिकवणीची नियामक शक्ती (Enforcing Power) आणि त्याचे प्रेरक अल्लाहचे भय, निवाड्याच्या दिवशी परलोकजीवनात हिशोब घेतला जाण्याची शक्यता आणि अंतहीन भविष्य बिघडण्याची भीती आहे. नैतिक आदेश देण्याबरोबरच कुरआन मानवाच्या हृदयात त्याचा संबंध वास्तविकपणे प्रत्येक क्षणी व प्रत्येक ठिकाणी त्यांचे कर्म पाहत असणाऱ्या अल्लाहशी असल्याची गोष्टसुद्धा बिंबवितो. मानव जगाच्या दृष्टीने लपू शकतो परंतु अल्लाहच्या दृष्टीने लपू शकत नाही. मानवास जगातील हे जीवन अल्पकाळासाठी लाभले आहे, तो या जगातील जीवनात काहीही करू शकतो, त्याला एक दिवस मरायचे आहेच, त्याने जे काही केले आहे त्याचा हिशोब अल्लाहच्या न्यायालयात द्यावा लागणार आहे. कुरआनमध्ये असा विश्वास व्यक्त करण्यात आला आहे की, परलोकात निवाड्याच्या दिवशी ज्याच्या सत्कर्माचे पारडे जड असेल तो स्वर्गात जाईल आणि ज्याचे हलके असेल तो नरकात जाईल. स्वर्गात जाणाऱ्यास सर्व प्रकारच्या सुख-सुविधा लाभतील परंतु नरकात

जाणाऱ्यास विविध प्रकारच्या यातना दिल्या जातील. त्या दिवशी कोणी कोणाच्या कामी येणार नाही, तेथे शिफारस, खोटे, लाच, वकिली, कपट काहीही चालणार नाही. अशा तऱ्हेने तेथे मानवाच्या कर्मांवर निष्पक्ष निर्णय होईल.

"मानवाने ज्यासाठी प्रयत्न केला आहे तेच त्याच्यासाठी आहे."

(कुरआन - ५३ : ३९)

अशाप्रकारे मानवाच्या हृदयात विश्वास निर्माण करून कुरआन जणू मानवाच्या हृदयात पोलीस चौकी बसवितो. ही पोलीस चौकी त्यास सदाचरणाच्या नियमांचे पालन करण्यास विवश करते. कुरआन मानवजातीकडून अल्लाहद्वारा निर्धारित नियमांवर आधारित जीवनप्रणालीची मागणी करतो. या जीवनप्रणालीत निषिद्ध तत्त्वे नसावीत, मानवतेच्या निरंतर उत्कर्षासाठी स्वीकारण्यात आलेल्या चांगुलपणाचा मार्ग अवलंबिणे आणि ज्या कुकर्मांना मानवतेने कायमचे वाईट समजले आहे त्यांना नष्ट केले जावे. मानव अल्लाहचा प्रतिनिधी असल्याकारणाने आपल्या सर्व कर्मांबाबत अल्लाहसमक्ष उत्तरदायी असतो. म्हणून जगात जे काही अधिकार व साधने त्यास देण्यात आली आहेत त्यांचा वापर अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी आणि मानवतेच्या उद्धारासाठी करणे मानवाचे कर्तव्य आहे.

### कुरआननुसार दृष्टीचा विकास

कुरआन या जगातील जीवनात मानवी दृष्टी विकसित करण्यासाठी दोन प्रकार सादर करतो. एक तात्त्विक दृष्टिकोन (Philosophical Approach) आणि दुसरा क्रियात्मक दृष्टिकोन (Applied Approach)

वैचारिक स्तरावर कुरआन धार्मिक विश्वास, अनुसरण, आत्मसंयम आणि शुद्ध आचरणाद्वारे मनुष्याच्या आत्मिक विकासाचा मार्ग निश्चित करतो. कुरआननुसार मानवाच्या हृदय व मस्तिष्कात अल्लाहच त्याचा स्वामी व उपास्य असल्याचा पूर्ण विश्वास असायला हवा. त्याची प्रसन्नताच त्याच्या समस्त कार्यांचे लक्ष्य आहे आणि ईशआज्ञाच त्याच्या जीवनाचा कायदा आहे. हा विश्वास जितका दृढ असेल तितक्या अधिक निष्ठेने मनुष्य मानवी विकासाचा मार्ग अवलंबू शकतो. मानवाने आपल्या जीवनात कोणत्याही प्रकारचे कार्य करताना हे लक्षात ठेवले पाहिजे की, त्यास आपले चिंतन, वचन व कर्माचा हिशोब अल्लाहला द्यावयाचा आहे आणि अल्लाहने निषिद्ध केलेली कर्मे करता कामा नयेत. मानवाने सद्गुणांचा अवलंब केवळ आपल्याच जीवनात न करता त्यांच्या प्रचार-प्रसाराचाही प्रयत्न करावा.

"सद्वर्तनाचे आवाहन करणारा व चांगुलपणाचा आदेश देणारा, तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट तुमच्यात अवश्य असला पाहिजे, अशा लोकांना साफल्य लाभेल."

(कुरआन - ३ : १०४)

कुरआनने व्यक्ती आणि समाजाच्या आध्यात्मिक विकासाकरिता निश्चित केलेल्या सिद्धान्तांच्या व्यवस्थेचे चार मुख्य स्तंभ आहेत - (१) सलात (प्रार्थना वा नमाज), (२) रोजा (रमजान महिन्यातील उपवास), (३) जकात (अनिवार्य दान) आणि (४) हज.

नमाज

नमाज दररोज पाच वेळा मानवाच्या मनात अल्लाहसंबंधी स्मृती जागृत करते, अल्लाहचे भय निर्माण करते, त्याच्याबद्दल प्रेम जागृत करते, ईश आदेशांची आठवण करून देते आणि त्याच्या अनुकरणाचे अध्ययन करविते.

''निश्चितच नमाज, कुकर्म, अश्लीलता व अपकृत्यांपासून रोखते आणि अल्लाहचे स्मरण याहूनही मोठी गोष्ट आहे.'' (कुरआन - २९ : ४५)

नमाज वैयक्तिक व सामूहिक स्वरुपात एक अनिवार्य कर्तव्य आहे कारण यामुळे संपूर्ण समाज सामूहिकपणे सदाचाराचा मार्ग अवलंबितो. अल्लाहबद्दल जसा उच्च भाव नमाजमध्ये आहे तो विचारणीय आहे. खरे तर नमाज संघशक्तीला चालना देते. जेव्हा एकाच स्वरात, एकाच भाषेत आणि एकाच मनोभावाने आशिया, यूरोप व आफ्रिकेत राहणारे लाखो मुस्लिम अल्लाहप्रति आपला भक्तीभाव अर्पित करण्यासाठी एकत्र येतात तेव्हा किती आनंदमय व उत्साहपूर्ण दृश्य असते ! एकाच ओळीत गरीब व श्रीमंत उभे राहून अल्लाहसमोर सर्व समान आहेत हे दाखविणारी समानता तर अप्रतिमच! नमाजमध्ये अल्लाहपाशी सदाचार शिकविण्याची व दुराचारापासून अलिप्त ठेवण्याची प्रार्थना केली जाते.

रोजा

''हे ईमानधारकांनो! विहित केले तुमच्यावर उपवास जसे विहित केले होते तुमच्या पूर्वीच्यांवर जेणेकरून तुम्ही धर्मपरायण व्हाल. हे काही ठराविक दिवसांचे उपवास आहेत, तर तुमच्यापैकी जे आजारी असतील किंवा प्रवासात असतील तर त्यांनी उपवासकाळानंतर उपवास करावेत आणि ज्या लोकांना उपवास करण्याचे सामर्थ्य असेल (परंतु उपवास करणार नाहीत) त्यांनी दुर्बलांना मोबदला (फिदिया) म्हणून जेऊ घालावे. एका उपवासासाठी एका दुर्बलाला जेऊ घालावे आणि जो स्वेच्छापूर्वक अधिक भले करील तर ते त्याच्या स्वत:साठीच हेच अधिक उचित आहे की तुम्ही उपवास करावा.''

(कुरआन - २ : १८३-१८४)

कुरआन रमजान महिन्यात रोजे ठेवण्याचा आदेश देतो. तो मुस्लिम समाजास वैयक्तिक व सामूहिक स्वरुपात संयमाची शिकवण देतो.

जकात

जकात मुस्लिमांमध्ये, त्याग, सहकार्य आणि पारंपरिक सहानुभूतीच्या भावनेस जन्म देते. यास कर म्हणणे चुकीचे आहे. याद्वारे गरिबांची मदत केली जाते.

"तुम्ही जोपर्यंत (अल्लाहच्या मार्गात) तुमच्या सर्वाधिक प्रिय वस्तू खर्च करत नाही, तोपर्यंत तुम्ही पुण्य प्राप्त करू शकत नाही." (कुरआन - ३ : ९२)

जकात अल्लाहच्या मार्गात खर्च आहे, हे या गोष्टीचे प्रतीक आहे की तो संपत्तीस आपली संपत्ती समजत नाही आणि अल्लहचा आदेश असलेल्या प्रत्येक ठिकाणी ती खर्च करू शकतो. ही गोष्ट पुरुष व स्त्री दोघांसाठी लागू आहे. अशा प्रकारे दानधर्माच्या बाबतीत कुरआन इतर कोणत्याही धर्मग्रंथापेक्षा मागे नाही.

हज

हज एक तीर्थयात्रा आहे. मुस्लिमांमध्ये विश्वव्यापी बंधुत्व निर्माण करणे हा याचा उद्देश आहे. याचे विधानदेखील एकतेच्या उद्देशानेच करण्यात आले होते.

कुरआनमधील सूरह बकराची १७७ वी आयत क्रियात्मक आणि विश्वासात्मक दोन्ही प्रकारचे दृष्टिकोन स्पष्ट करते,

"सदाचार हा नव्हे की तुम्ही आपले तोंड पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे करावे तर सदाचार हा आहे की जे अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर ईमान बाळगतात तसेच सर्व दूतांवर, सर्व ग्रंथ आणि सर्व पैगंबरांवर ईमान बाळगतात. ईशप्रेमापोटी आपल्याला प्रिय असलेली संपत्ती आपले नातेवाईक आणि अनाथ, गरजवंत, वाटसरू व याचक तसेच गुलामांच्या मुक्ततेसाठी खर्च करतील आणि नमाज कायम करतील व जकात अदा करतील. तसेच दिलेल्या वचनांची पूर्तता करतील आणि अडचणी, संकटे आणि युद्धप्रसंगीदेखील संयम करतील हेच लोक सत्यशील आणि अल्लाहचे भय बाळगणारे आहेत." (कुरआन - २ : १७७)

कुरआनमध्ये कुरबानीचा उल्लेख आले आहे, परंतु याचा वास्तविक उद्देश संयम आणि ईशपरायणता असल्याचे म्हटले आहे. एके ठिकाणी म्हटले आहे,

"त्यांचे मांसही अल्लाहला पोहचत नाही आणि त्यांचे रक्तदेखील नाही परंतु त्याला तुमची निष्ठा पोहचते." (कुरआन - २२ : ३७)

अशा प्रकारे कुरआन वास्तविकपणे आम्हा मानवांना उदार मनाचे होण्याची शिकवण देतो, अंधविश्वासू होण्याची नाही. कुरआनमध्ये सदाचारावर जोर देण्यात आला आहे आणि यात मानवाने सत्यतेच्या मार्गावर चालावयास हवे असे म्हटले आहे.

सामाजिक व्यवस्था

कुरआनची स्वत:चीच आचारसंहिता आहे. मानवांमध्ये जन्माच्या आधारावर निर्माण करण्यात आलेला उच्चनीचतेचा भेदभाव कुरआनच्या दृष्टीने अज्ञानतेचे लक्षण आहे. सर्व मानव अल्लाहचे दास आहेत असे त्याचे म्हणणे आहे. त्यामुळे सर्व एकमेकांचे बांधव आहेत आणि समान आहेत. मानवामानवांमध्ये वर्ण, जाती अथवा देशाच्या आधारावर भेदभाव असू शकत नाही तर तो फक्त आचरण, शील आणि सिद्धान्तांच्या आधारावर असू शकतो. कुरआन वर्ण, जाती, वंश, भाषा, भौगोलिक व राजकीय सीमा ओलांडून पसरू पाहणाऱ्या समाजाची संकल्पना सादर करतो. आणि याच आधारावर एका विश्वव्यापी बंधुभाव व समानतेची निर्मिती करतो. कुरआन व्यक्ती व समाजादरम्यान योग्य संतुलन निर्माण करण्यासाठी मानवी जीवनातील अनेक पैलूंमध्ये (संबंध व संपर्कांमध्ये) सुधारणा घडवून आणतो. कुरआन जुगार खेळणे, मद्यपान व स्त्री-पुरुषांच्या स्वैर संबंधावर निर्बंध घालतो, कारण हे सर्व सामाजिक अथवा वैयक्तिक जीवन विकृत करतात.

विवाह

सामाजिक जीवनात कुरआन काही विशिष्ट नाते-संबंधांना विवाहाकरिता अवैध ठरविल्यानंतर दूरच्या व जवळच्या नातेवाईकांमधील विवाहास वैध ठरवितो. उपजातीतील भेदभाव नष्ट करून सर्व मुस्लिमांदरम्यान विवाहसंबंध जोडण्याचा आदेश देतो. विवाह इस्लामी समाजात एक साधा विधी आहे जो कुठेही दोन साक्षीदारांसमोर प्रौढ स्त्री-पुरुषाच्या पारंपरिक स्वीकृतीने पार पाडू शकतो. विवाह अवघड व व्यभिचार सोपे कार्य होऊ नये याकरिता असे करण्यात आले आहे.

स्त्रीची अवस्था

कुटुंबात पुरुषास घरामध्ये अनुशासन राखण्याच्या उद्देशाने व्यवस्थापकाचे स्थान देण्यात आले आहे, परंतु याचा अर्थ असा नव्हे की, स्त्रीला एका विवश दासीच्या स्वरुपात त्याच्या अधिकार कक्षेत देण्यात आले आहे.

''हे ईमानधारकांनो! तुमच्याकरिता हे वैध नाही की तुम्ही बळजबरीने स्त्रियांचे वारस बनावे आणि हेदेखील वैध नाही की त्यांना त्रास करून त्या स्त्रीधनाचा काही भाग तुम्ही हिरावून घेण्याचा प्रयत्न कराल. जो तुम्ही त्यांना देऊन टाकला आहे, परंतु जर त्या उघडपणे अश्लील कृत्ये करतील तर (तुम्हाला जरूर त्यांना त्रास देण्याचा अधिकार आहे.) त्यांच्याशी चांगल्याप्रकारे जीवन व्यतीत करा. जर त्या तुम्हाला नापसंत असतील तर शक्य आहे की एखादी गोष्ट तुम्हाला पसंत नसेल परंतु अल्लाहने त्यांच्यात बरेचसे भले ठेवले असेल.'' (कुरआन - ४ : १९)

इतकेच नव्हे तर कुरआन स्त्रियांशी समानतेने व आदराने वागण्याचा आदेश देतो. सर्व मानव समान आहेत कारण सर्वांचे मूळ एक आहे, असे तो म्हणतो. त्यांच्यादरम्यान रंग, वंश, लिंग, जात, व्यवसायाच्या आधारावर भेदभाव करणे अनुचित आहे.

पुरुषांकरिता सर्वांत मोठी संपत्ती एक उत्तम पत्नी आहे, असे कुरआन म्हणतो. तसेच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"(परलोकातील कामात (अर्थात सत्कर्मांत) तुमचे सहाय्य करण्यासाठी) तुमच्यापैकी प्रत्येकाकडे कृतज्ञ हृदय, अल्लाहचे स्मरण करणारी वाचा आणि ईमानधारक पत्नी असावी."

(हदीस)

नातेसंबंध

कुरआन म्हणतो की आपल्या आईवडिलांचा आदर करा, अल्लाहव्यतिरिक्त कोणा दुसऱ्यास उपास्य मानण्यास त्यांनी सांगितले तर ते न ऐकता त्यांच्या आज्ञा पाळा. मृत्यू जवळ आल्यास आपल्या संपत्तीबाबत मृत्यूपत्र बनविले पाहिजे. त्यांच्या संपत्तीत त्यांचे माता-पिता, अपत्ये आणि जवळच्या नातेवाईकांचा हिस्सा ठेवण्यात आला आहे. कुरआनमध्ये ठिकठिकाणी नातेवाईकांशी सद्व्यवहार करण्याचे आदेश देण्यात आले आहेत आणि सद्व्यवहाराचा अवलंब करणे हे पुण्यकर्म असल्याचे म्हटले आहे. त्यांच्याशी तटस्थ राहण्याची निंदा करण्यात आली आहे. तसेच ते अन्याय करीत असतील तर त्यांचे समर्थन करण्यापासून रोखण्यात आले आहे. जर एखादा राजकीय पदाधिकारी जनतेच्या पैशाने नातेवाईकांचे पालनपोषण करीत असेल अथवा आपल्या निवाड्यांमध्ये आपल्या नातेवाईकांबरोबर अनुचित पक्षपात करीत असेल तर हे कुरआनविरोधी कर्म मानण्यात आले आहे.

शेजाऱ्यांशी वागणूक

कुरआनच्या आदेशांनुसार शेजारी सहकार्य, सहानुभूती आणि सद्व्यवहारास पात्र आहेत. ही गोष्ट हदीसमध्ये पुढीलप्रणामे व्यक्त करण्यात आली आहे,

"ज्या व्यक्तीच्या दुर्व्यवहारामुळे तिचा शेजारी अशांतता अनुभवत असेल तर ती व्यक्ती धर्मात्मा नाही."

(हदीस)

"जो मनुष्य स्वत: पोटभर जेवतो आणि त्याचा शेजारी मात्र उपाशी राहतो, तो ईमानधारक असू शकत नाही."

(हदीस)

पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, की जर तुमचे शेजारी तुम्हास चांगले समजत असतील तर निश्चितच तुम्ही चांगले आहात. परंतु जर तुमच्या शेजाऱ्याचे तुमच्याबद्दलचे मत वाईट असेल तर तुम्ही वाईट व्यक्ती आहात.

(हदीस)

अशाप्रकारे कुरआन सामाजिक जीवनात सर्व सद्वर्तन व गुण असलेल्या स्वस्थ मूल्यांची स्थापना करतो.

न्यायपूर्ण व्यवहारांवर जोर

कुरआन संपत्तीच्या समान वितरणाऐवजी न्यायपूर्ण वितरणावर जोर देतो, कारण निसर्गात कुठेही समान स्वरुपात वितरण आढळत नाही. कुरआननुसार, मानवाने वैध साधनांद्वारे संपत्ती कमवावी आणि आपल्या गरजा पूर्ण कराव्यात. मग उरलेल्या संपत्तीचा

आपला नैतिक स्वभाव व समाजाची कोणत्याही प्रकारची हानी न करता वापर करावा. उदाहरणार्थ, कुरआन मद्यपान, व्यभिचार, जुगार, साठेबाजी, अतिव्यय आणि कंजूसपणास निषिद्ध ठरवितो. कुरआनची शिकवण अशीदेखील आहे,

"जे वैध रीतीने उपजीविका प्राप्त करतात त्यांच्यावर ईशप्रेम करतो. उपाशी असणाऱ्यांना जेवण द्या, आजाऱ्यांची सेवा करा, संकटग्रस्तांची मदत करा. तुम्ही जोपर्यंत (अल्लाहच्या मार्गात) तुमच्या सर्वाधिक प्रिय वस्तू खर्च करत नाही, तोपर्यंत तुम्ही पुण्य प्राप्त करू शकत नाही." (कुरआन - ३ : ९२)

कुरआनमध्ये व्याज घेण्याचा निषेध करण्यात आला आहे.

"हे ईमानधारकांनो! हे दामदुप्पट व्याज खाण्याचे सोडून द्या आणि अल्लाहचे भय बाळगा, आशा आहे की सफल व्हाल." (कुरआन - ३ : १३०)

कुरआन मागणाऱ्या आणि न मागणाऱ्या गरजवंतांची मदत करण्याचा आदेश देतो.

"आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार करू नका. आम्ही त्यांनाही उपजीविका देऊ आणि तुम्हालासुद्धा. वस्तुत: त्यांना ठार करणे एक मोठा अपराध आहे." (कुरआन - १७ : ३१)

"आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क होता याचकांचा व वंचितांचा." (कुरआन - ५१ : १९)

"त्यांच्या मालमत्तेत याचक व वंचित असलेल्यांचा एक ठराविक हक्क आहे." (कुरआन - ७० : २४-२५)

स्वातंत्र्य

कुरआन मानवाच्या वैयक्तिक स्वातंत्र्याच्या रक्षणाचे समर्थन करतो. मानवजातीच्या कल्याणाकरिता आवश्यक असलेल्या त्यावरील मर्यादित नियंत्रणाचीच आज्ञा देतो. कारण प्रत्येक मानव व्यक्तिगत स्वरुपात अल्लाहसमोर उत्तरदायी आहे, म्हणून मानवास आपल्या व्यक्तित्वाचा विकास व सत्कर्म करण्यासाठी अधिकाधिक संधी मिळणे गरजेचे आहे जेणेकरून मानवी जीवनात दानशीलपणा, सहानुभूती, उपकार आणि अन्य गुणांनी क्रियात्मक रूप धारण करावे.

कुरआननुसार जो मानवसमाजाचे कल्याण करतो तो मनुष्य उत्तम आहे.

"पृथ्वीवर घमेंडीत चालू नका, तुम्ही पृथ्वीला फाडूही शकत नाही किंवा पर्वताच्या उंचीला गाठू शकत नाही." (कुरआन - १७ : ३७)

गर्व मानवास नैतिक पतनाकडे नेतो. हा दोष मानवसमाजाकरिता हानिकारक आहे. लोकांनी आपल्यापेक्षा इतर लोकांना नीच व हीन समजू नये आणि त्यांच्याशी अमानुष वर्तन करू नये, तरच पारस्परिक संबंध व स्नेहसंबंध सहानुभूतीपूर्ण राहतील.

सारांश

अशाप्रकारे कुरआन मानवजातीसमोर एक अशी व्यवस्था सादर करतो ज्यात

जीवनाचे आध्यात्मिक, सामाजिक, आर्थिक व नैतिक पैलू येतात. मानवजीवनाचा कोणताही पैलू त्याच्या परिघाबाहेर नाही. कुरआन ''तुमचा धर्म तुमच्यासाठी आणि माझा धर्म माझ्यासाठी'' यासारखा आदेश देऊन धार्मिक सहिष्णुतेवर जोर देतो. त्याच्या मते कुरआनने कोणत्याही नवीन धार्मिक समुदायाचा संदेश जगामध्ये आणलेला नाही, तो तर मानवतेला 'अल्लाहने बनविलेल्या नियमांचे पालन करणे' या एकमेव मार्गावर एकत्र आणू इच्छितो. कुरआनमध्ये म्हटले आहे, की मानवसमाजाने समजून घेतलेल्या चांगलेपणाच्या कार्यांनाच ईशधर्म मानवाचे आवश्यक कर्तव्य ठरवितो. त्याचप्रमाणे लोकांना अमान्य असलेल्या आणि सर्व धर्मांच्या दृष्टीने वाईट असलेल्या सर्व कार्यांना ईशधर्मविरोधी व निषिद्ध ठरवितो. कुरआन मानवास अल्लाहचा प्रतिनिधी मानतो, याकरिता तो आपल्या कर्मांसाठी परलोकात अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाहसमोर उत्तरदायी आहे. परलोक निव्वळ दार्शनिक विचार नसून मानवी सद्व्यवहाराची नियामक शक्ती आहे. कुरआन मनुष्याच्या वैयक्तिक स्वातंत्र्याचा समर्थक आहे. तो संपत्तीच्या समान वितरणाऐवजी न्यायपूर्ण वितरणाची व्यवस्था करतो. कुरआननुसार सदाचारण धर्माचे मूलतत्त्व आहे. कुरआन भाग्यवाद मान्य करीत नाही. कारण भाग्यवाद मानवाच्या प्रयत्नास दुर्बल बनवितो आणि त्यास सदाचरण करण्यापासून परावृत्त करतो.

कुरआनचा आदेश आहे की, मानवाने भलाई व चांगुलपणाच्या कार्यात हिरिरीने भाग घ्यावा आणि वाईटपणापासून वाचण्याचा आटोकाट प्रयत्न करावा. तो म्हणतो, मानवाने जे काही कमविले आहे तेच त्यास लाभेल.

कुरआन मनुष्यास मानवी गौरव प्रदान करतो. कुरआनमध्ये मानवी दृष्टिकोन विकसित करण्यासाठी अल्लाहमध्ये विश्वास, अनुसरण, संयम व समर्थनीय आचरणाचा विश्वासात्मक सिद्धान्त सादर करण्यात आला आहे, तसेच त्यांना क्रियात्मक रूप देण्याकरिता नमाज, रोजा, जकात हजची व्यवस्था निश्चित करण्यात आली आहे.

कुरआन म्हणतो, की अल्लाहने जो कल्याणाचा मार्ग मानवाकरिता निश्चित केला आहे. त्याचे योग्य अनुसरण करणे हीच धर्माची सत्यता आहे. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनात संपूर्ण मानवजातीकरिता जे कार्य केले ते एका आरशासमान स्पष्ट आहे. जर आज आपण बाह्य अवडंबरांऐवजी कुरआनचे अनुसरण केले तर आपण आपल्या प्रयत्नांद्वारे संपूर्ण मानवजातीस एकतेच्या सूत्रात बांधू शकतो, ज्यात जाती नाही, धर्म नाही, वर्ग नाही की कोणी उच्च-नीच नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी भटकलेल्या मानवतेच्या कल्याण व उद्धाराचा मार्ग प्रशस्त करण्यासाठी म्हटले आहे, की जीवनात यश संपादन करण्याचा एकमेव मार्ग एक अल्लाहची उपासना व सदाचरण आहे. मानवाने स्वार्थरहित होऊन, सर्व इच्छा आकांक्षाचा त्याग करून मानवतेच्या कल्याणासाठी एकमेकांबरोबर सद्व्यवहार करायला हवा, ज्यामुळे तो अल्लाहच्या जवळ जाऊ शकेल.

'आपणा सर्वांना शांती व अल्लाहची कृपा लाभो.'

* समाप्त *